




महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

**प्रशिक्षण/सर्वप्राथम्य**

क्रमांक: कअनि ११२३/प्र.क्र.०९/१४ब दिनांक:- ०८ जून, २०२३.

**प्रति,**

सह सचिव/उप सचिव (आस्थापना)
महसूल व वन विभाग/ सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**विषय:-राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सन २०२३ मधील प्रशिक्षण कक्ष अधिकारी (गट ब) यांचे पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण. नामनिर्देशित कक्ष अधिकाऱ्यांचे प्रशिक्षण रद्द करणेबाबत.**

**संदर्भ:-** शासन पत्र समक्रमांक दिनांक २५.०५.२०२३.

**महोदय/महोदया,**

उपरोक्त संदर्भीय पत्र दिनाक २५.०५.२०२३ अन्वये, कक्ष अधिकारी पदावर पदोन्नत झालेल्या व पदोन्नतीनंतरच्या प्रशिक्षणासाठी पात्र असलेल्या कक्ष अधिकाऱ्यांसाठी प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती), पुणे येथे दिनांक ०५.०६.२०२३ ते दिनाक १६.०६.२०२३ या कालावधीमध्ये ०२ आठवड्यांचे पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण आयोजित करण्यात आले आहे. सदर प्रशिक्षणाकरिता नामनिर्देशित केलेल्या कक्ष अधिकाऱ्यांपैकी खालील तक्त्यात नमूद कक्ष अधिकाऱ्याचे नाव उक्त प्रशिक्षण सत्रामधून वगळण्याबाबतची विनंती संबंधित विभागाकडून प्राप्त झाली आहे.

| अ.क्र. | श्री/श्रीमती | कक्ष अधिकाऱ्यांचे नांव | विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्री | सतिश बा. रेंगे | महसूल व वन विभाग |
| २. | श्रीमती | ऋतुजा श.गवळी | महसूल व वन विभाग |
| ३. | श्री | संदिप आ. जाधव | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |

२. त्यानुसार वरील नमूद कक्ष अधिकाऱ्यांची नावे दिनांक ०५.०६.२०२३ ते दिनाक १६.०६.२०२३ या कालावधीत आयोजित केलेल्या प्रशिक्षण सत्रामधून वगळण्यात येत आहेत. तसेच पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण हे राज्य प्रशिक्षण धोरण व महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ अन्वये देण्यात येत असून ते अनिवार्य असल्याने यापुढील प्रशिक्षण सत्रामध्ये उक्त नमूद अधिकारी उपस्थित न राहिल्यास **महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ मधील नियम ५ मध्ये नमूद केलेल्या तरतूदीनुसार कारवाईस पात्र ठरतील** तसेच यापुढील प्रशिक्षण सत्रामधून नांव वगळण्याबाबतची कोणतीही विनंती मान्य करण्यात येणार नाही. सदर बाब संबंधित कक्ष अधिकारी यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावी.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६०८१५१३०११४०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.06.08 15:14:14 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतः- माहिती व पुढील कार्यवाहीस्तव**

१) संचालक, प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती), पुणे.
२) निबंधक तथा सहाय्यक प्राध्यापक, प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती), पुणे.
३) उप सचिव (का.१२ अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४) संबंधित अधिकारी (प्रशासकीय विभागामार्फत)
५) निवडनस्ती/१४ब.